**न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील "वैज्ञानिक अधिकारी (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब या पदासाठीच्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष अर्हता घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र. एफएसएल-०४२१/प्र.क्र.२३४/पोल-४**
दुसरा मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३० मे, २०२३

**संदर्भ**:-१) गृह विभाग,शासन निर्णय क्रमांक एफएसएल-०४२१/प्र.क्र.२३४/पोल-४,दि.१८.०४.२०२३

**प्रस्तावना:-**

वैज्ञानिक अधिकारी (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफीत विश्लेषण), गट-ब पदाच्या अर्हतेच्या समकक्षतेबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र. २२/२०२३ च्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दि.०१.०२.२०२३ रोजी आदेश पारित केले होते. सदर आदेशाच्या अनुषंगाने शासनाने दि.१८.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये उच्च व तत्र शिक्षण विभागाच्या अभिप्रायानुसार वैज्ञानिक अधिकारी (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफीत विश्लेषण), गट-ब या पदासाठी आवश्यक असणा-या अर्हतेसंबंधी समकक्षता घोषित केली आहे. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दि.२५.०४.२०२३ रोजी पारित केलेल्या आदेशामध्ये सदर समकक्षता पूर्वलक्षी प्रभावाने, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रसिध्द केलेल्या जाहिरात क्र.०३७/२०२२, दि.१४.०४.२०२२ पासून लागू करणेबाबत निदेश देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील "वैज्ञानिक अधिकारी (संगणक गुन्हे, ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार समकक्ष शैक्षणिक अर्हता पूर्वलक्षी दिनांकापासून लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक** :-

संदर्भाधीन शासन निर्णय दि.१८.०४.२०२३ च्या परिच्छेद क्र.२ मध्ये "प्रस्तुत शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०९/२०२२-तांशि-२, दि.१६.०१.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे" नंतर पुढीलप्रमाणे वाक्य अंतर्भूत करण्यात येत आहे.

" सदर शासन निर्णयामधील शैक्षणिक अर्हतेची समकक्षतेची तरतूद, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रसिध्द केलेल्या (जाहिरात क्र.०३७/२०२२) या वैज्ञानिक अधिकारी (सायबर गुन्हे,ध्वनी व ध्वनीफित विश्लेषण), गट-ब या पदाच्या दि.१४.०४.२०२२ रोजी जाहिरात प्रसिध्द केलेल्या दिनांकापासून लागू राहतील."

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२३०६०११६२६५१७०२९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2023.06.01 16:27:50 +05'30'

**( सुधाकर यादव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राने)

३. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. संचालक, न्यायसहायक विज्ञान संस्था, १५-मादाम कामा रोड, फोर्ट, मुंबई-३२
६. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर, पुणे, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोल्हापूर, नांदेड
७. उपसंचालक, लघु न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, चंद्रपूर, धुळे, रत्नागिरी, ठाणे व सोलापूर
८. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती, कोल्हापूर, नांदेड,चंद्रपूर, धुळे, रत्नागिरी, ठाणे व सोलापूर
१२. निवड नस्ती, गृह विभाग (पोल-४).